**कृषी संजीवनी योजना-२०१४ ला दि.३१/०३/२०१६ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण -२०१४/प्र.क्र.१४८(१)/ऊर्जा-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १७ नोव्हेंबर, २०१५.

**संदर्भ** : - १) शासन निर्णय,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग क्र. संकीर्ण -२०१४/ प्र.क्र.१४८/ऊर्जा-५, दि.१९/०६/२०१४.
२) शासन निर्णय,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग क्र. संकीर्ण -२०१४/ प्र.क्र.१४८/ऊर्जा-५, दि.११/०९/२०१४.
३) शासन निर्णय,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग क्र. संकीर्ण २०१४/ प्र.क्र.१४८(१)/ऊर्जा-५. दि.१९/१२/२०१४.

**प्रस्तावना:-**

राज्यातील महावितरण कंपनीच्या कृषी ग्राहकांना मदत करण्याच्या दृष्टीने व त्यांच्याकडील वीज देयकांच्या थकीत रकमेचा बोजा कमी करण्याच्या दृष्टीने शासनाने "कृषि संजीवनी योजना -२०१४" ही योजना सुरुवातीला दि.३१/८/२०१४ पर्यंत राबविण्यात आली होती. या योजनेस दि.३१/१०/२०१४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. तद्नंतर उपरोक्त क्र.३ येथील दि.१९/१२/२०१४ च्या शासन निर्णयान्वये या योजनेची मुदत दि.३१/३/२०१५ पर्यंत वाढविण्यात आली होती.

२. या योजनेअंतर्गत कृषी ग्राहकांनी त्यांच्या दि.३१/३/२०१४ पर्यंतच्या मूळ थकबाकी रकमेच्या ५०% रक्कम एकरकमी किंवा ३ मासिक हप्त्यामध्ये भरली तर उर्वरित मूळ थकबाकीच्या ५०% रक्कम शासनाकडून महावितरण कंपनीला अनुदान स्वरुपात देण्यात येणार आहे. तसेच या योजनेमध्ये भाग घेणाऱ्या कृषी ग्राहकांचे दि.३१/३/२०१४ रोजी थकीत असलेले पूर्ण व्याज व दंड हे महावितरण कंपनीतर्फे माफ करण्यात येणार आहे.

३. या योजनेत सहभागी होण्यासाठी राज्यातील कृषी ग्राहकांकडून सदर योजनेची मुदत वाढवून देण्याबाबत मागणी होत असल्याने, कृषी संजीवनी योजना-२०१४ ला पुन्हा मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय :-**

"कृषी संजीवनी योजना - २०१४" ची मुदत दि.३१/०३/२०१६ पर्यंत वाढविण्यास शासन निर्णय द्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौ.संदर्भ क्र.३४२/१५/व्यय-१६, दि.२६/१०/२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५१११७१७३४१२२८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhimashankar Yallapa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallapa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400051, st=Maharashtra, cn=Bhimashankar Yallapa Manta
Date: 2015.11.17 17:37:26 +05'30'

**( भि.य.मंता )**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री(ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
४) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद,विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई.
५) अध्यक्ष, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर, सेंटर नं. १, १३वा मजला, कुलाबा,मुंबई ०५.
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज मंडळ सुत्रधारी कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व),मुंबई-५१
७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर
९) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२) अवर सचिव (रोखशाखा), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) कक्ष अधिकारी, (अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.